राज्यातील बंद पडलेल्याआश्रमशाळांचे हस्तांतर / स्थलांतर करण्याकरीता प्राप्त अर्जांची छानननी करण्याकरीता समितीचे गठन करण्याबाबत...

महाराष्ट्र शासन

विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग

**शासन निर्णय क्र. विभशा-२०१२/प्र.क्र.२२१/ विजाभज-२**

मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-३२

दिनांक : २१ सप्टेंबर , २०१८

**वाचा:-** 

**१) विमुक्त जाती भटक्या जमाती इतर मागास वर्ग व विशेष मागास प्रवर्ग कल्याण विभाग, शासन निर्णय क्रमांक क्र.विभशा-२०१२/प्रक्र.२२१/विजाभज-२ दि.२४.०४.२०१८**

**२) शासन पत्र क्र.विभशा-२०१२/प्र.क्र.२२१/विजाभज-२,दि.२९/०५/२०१८**

**प्रस्तावना:-**

मान्यता रद्द केलेल्या किंवा बंद पडलेल्या आश्रमशाळा अन्य संस्थांना हस्तांतरीत / स्थलांतरीत करण्यासाठी तसेच सध्या कार्यरत असलेल्या आश्रमशाळा अन्य ठिकाणी स्थलांतरीत करण्यासाठी किंवा इतर संस्थेकडे हस्तांतरीत करण्यासाठी शासनाने संदर्भीय शासन निर्णयान्वये कार्यपद्धती नमूद करण्यात आलेली आहे. सदरहू शासन निर्णयानुसार वाचा येथील क्र. ०२ नुसार राज्यातील काही बंद पडलेल्या आश्रमशाळांचे हस्तांतर / स्थलांतर करण्याबाबत जाहिरात देउुन खुले प्रस्ताव मागविण्यात आले आहेत.

सदर जाहिरातीनुसार प्राप्त झालेल्या प्रस्तावांची छाननी वाचा येथील शासन निर्णयानुसार करण्यात आली. तथापि प्राप्त झालेल्या अर्जातील बहुतांश संस्था सदर शासन निर्णयामध्ये नमूद अटी व शर्तीची पूर्तता करन नसल्याने पात्र संस्थेची निवड करण्यासाठी वाजवी स्पर्धा होत नसल्याची बाब शासनाच्या निदर्शनास आली. त्यामुळे बंद पडलेल्या आश्रमशाळा इच्छूक स्वयंसेवी संस्थांना इस्तांतरीत / स्लांततरीत करण्यासाठी प्राप्त प्रस्तावांची पुन्हा तपासणी करण्यासाठी शासन स्तरावर समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

बंद पडलेल्या आश्रमशाळा इच्छूक स्वयंसेवी संस्थांना इस्तांतरीत / स्लांततरीत करण्यासाठी प्राप्त प्रस्तावांची पुन्हा तपासणी करण्यासाठी शासन स्तरावर खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येते आहे:-

| **अ.क्र.** | **नांव** | **पदनाम** |
|---|---|---|
| १. | श्री.भा.र.गावित, सहसचिव, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई. | अध्यक्ष |
| २. | श्री.पी.एम.परदेशी, सहायक संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, पुणे | सदस्य |
| ३. | श्री.कि.आ.फुलझेले, अवर सचिव, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई. | सदस्य सचिव |

उपरोक्त समितीने खालील बाबींची तपासणी करावी.

१. आश्रमशाळा मंजुर झाल्यानंतर ज्या संस्थेकडे स्वत:च्या मालकीची जमीन नसल्यास सदर जमीन ०१ महिन्याच्या आंत स्वत:च्या मालकीची खरेदी करणे आवश्यक आहे. याबाबतचे रू. १००/- स्टॅप पेपर वर हमीपत्र घेण्यात येईल. तो पर्यंत आश्रमशाळा सुरू करता येणार नाही.

२. प्रस्तावित आश्रमशाळा त्याच गावात किंवा नजीकच्या गावात सुरू होईल अशा प्रस्तावांना प्राधान्य द्यावे.

३. संस्थेकडे शाळा / आश्रमशाळा चालविण्याचे पूर्वानुभव असल्यास त्या संस्थेस प्राधान्य द्यावे.

४. मान्यता रद्द केलेल्या शाळेपासून जवळच्या शाळेला प्राधान्य द्यावे.

वरील समितीने प्राप्त झालेले आश्रमशाळांबाबतचे सर्व प्रस्तावांची छाननी करून ०७ दिवसांत आपला अहवाल शासनास सादर करावा. सदर छाननी समितीची कार्यकक्षा शासन पत्र दि. २९/०५/२०१८ अन्वये संचालक विजाभज इमाव व विमाप्र कल्याण पुणे यांनी दिलेल्या जाहिरातीच्या अनुषंगाने प्राप्त प्रस्तावांची छाननी करण्यापूरतेच मर्यादित राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१८०९२११७२१५०५१२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bhaurao Raghunath Gavit

Digitally signed by Bhaurao Raghunath Gavit
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=VJNT OBCS SBC Welfare Dept., postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=692454783803b1bf08be0ff2505a01eb578c61edfbb827457be5704f5b440067, serialNumber=950bc6a64b0801087d4b403d7351619557bcd3489ca14b4e0f644bf05a04e89c, cn=Bhaurao Raghunath Gavit
Date: 2018.09.21 17:36:36 +05'30'

(भा. र.गावित)

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई

२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई

३) मा.मंत्री, विजाभज,इमाव व विमाप्र कल्याण यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई

४) मा.राज्यमंत्री, विजाभज,इमाव व विमाप्र कल्याण यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई
५) सचिव,विजाभज,इमाव व विमाप्र कल्याण यांचे स्वीय सहायक,मंत्रालय, मुंबई
६) संचालक,विजाभज,इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, पुणे
७) विभागातील सर्व सह सचिव/उप सचिव/अवर सचिव,मंत्रालय, मुंबई
८) सर्व विभागीय आयुक्त, महाराष्ट्र राज्य
९)प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण विभाग (सर्व)
१०) सहायक आयुक्त, समाज कल्याण विभाग (सर्व)
११) जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१२) निवड नस्ती (विजाभज-२)